सन २०१५-१६ या वित्तीय वर्षातील
अर्थसंकल्पित तरतुद वितरीत करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक : एमसीओ-२०१५/प्र.क्र. १७८/नवि-१४
मादम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : १० जून, २०१५

वाचा:

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थस २०१५/प्र.क्र.८५/ अर्थ-३, दि. १७.०४.२०१५
२. शासन परिपत्रक, नगर विकास विभाग क्र. बीयुडी २०१५/प्र.क्र. १०४/नवि-४, दि. १४.०५.२०१५
३. नगरपरिषद प्रशासन संचालयानलय यांचे पत्र क्र.नपप्रसं/अर्थ.अंदाज/२०१५-१६/ प्र.क्र.५७/८, दि.०८.०६.२०१५

प्रस्तावना :-

वित्त विभागाच्या दि. १७.०४.२०१५ च्या परिपत्रकान्वये सन २०१५-१६ च्या प्रथम आठमाही करीता (नोव्हेंबर-२०१५ अखेर) आवश्यक असणारा योजनेतर व योजनांतर्गत अर्थसंकल्पित निधी एकुण वार्षिक तरतूदीच्या ७०% च्या मर्यादेत वितरीत करण्याबाबतच्या सुचना देण्यात आल्या आहेत. तसेच दि. १७.०४.२०१५ च्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अटींची पुर्तता होत असल्यास उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी वितरीत करण्यास प्रशासकीय विभागांना मुभा देण्यात आली आहे.

०२. उपरोक्त अ.क्र. २ येथील परिपत्रकान्वये मागणी क्र. एफ-२, २२१७, (००) (६०) जकात कर व महागाई भत्ता रद्द केल्यामुळे नगरपरिषदांना सहाय्यक अनुदान (२२१७८०६६) (दत्तमत) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ च्या एकुण उपलब्ध तरतुदीच्या १२०० कोटीच्या ७०% च्या मर्यादेत म्हणजे रु. ८४० कोटी इतकी रक्कम नवि-१४ या कार्यासनाकडे सुपूर्द करण्यातआली आहे.

०३. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांनी संदर्भ क्र. ३ येथिल दि.८.०६.२०१५ च्या पत्रान्वये सन २०१४-१५ मध्ये नगरपरिषदांना सहाय्यक अनुदान या प्रयोजनार्थ वितरीत करण्यात आलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा जास्त रक्कमेचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाले असल्याबाबत नमूद केले आहे. त्याचप्रमाणे सन २०१५-१६ या वर्षाकरीताचे अनुदान वितरीत करण्याबाबत विनंती केली आहे.

**शासन निर्णय :-**

०१. शासन परिपत्रक वित्त विभाग दि. १७.०४.२०१५ मध्ये विहीत केलेल्या अटींची पूर्तता होत असल्यामुळे अ.क्र.२ येथिल शासन निर्णय नगर विकास विभाग दि.१४.०५.२०१५ अन्वये नवि-१४ कार्यासनासकडे सुपूर्द केलेला उक्त लेखाशिर्षाखालील रु. ८४० कोटी एवढा निधी आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांना वितरीत करण्यात येत आहे.

०२. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांनी उक्त रु.८४० कोटी एवढे सहायय्क अनुदान संबंधित नगरपरिषदा / नगरपंचायती यांना वितरीत करताना शासन परिपत्रक वित्त विभाग, दि.१७.०४.२०१५ व शासन परिपत्रक नगर विकास विभाग, दि.१४.०५.२०१५ च्या आदेशातील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे. त्याच प्रमाणे ज्या नगरपरिषदांनी १००% खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे सादर केली आहेत, अशाच नगरपरिषदांना, त्यांना अनुज्ञेय असलेले सहाय्यक अनुदान वितरीत करण्यात येईल, याची दक्षता घ्यावी.

०३. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांनी उपरोक्त अनुदानाचे वितरण करताना या संबंधातील शासनाचे यापुर्वीचे आदेशही विचारात घ्यावेत.

०४. निधी खर्च झाल्यानंतर त्याची उपयोगिता प्रमाणपत्र पुढील प्रस्तावासोबत सादर करण्यात यावीत.

०५. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थस २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि. १७.०४.२०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१०१४०२१३६६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2015.06.10 14:04:56 +05'30'

( ज. ना. पाटील )

**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई

२. सर्व विभागीय आयुक्त

३. सर्व जिल्हाधिकारी

४. महालेखापाल (ले व अ) महाराष्ट्र-१ व २, मुंबई/ नागपूर

५. महालेखापाल (ले.प.) महाराष्ट्र-१ व २, मुंबई/ नागपूर

६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

७. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई

८. वित्त विभाग (व्यय-३), अर्थ-३,मंत्रालय, मुंबई

९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

११. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

१२. कक्ष अधिकारी, नवि /४

१३. निवड नस्ती, नवि १४